**नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेची महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ८८ अंतर्गत चौकशीसाठी प्राधिकृत अधिकारी यांची नियुक्ती करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: जिमस ०६१७/प्र.क्र१२६/२-स,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ जूलै, २०१७.

**वाचा**:-१) जनहित याचिका क्र २५/२०१४ मधील मा. उच्च न्यायालयाचे निर्देश दि. ५.५.२०१७
२) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर यांचा प्रस्ताव,दि.९.६.२०१७ दि. ४.७.२०१७

**प्रस्तावना : -**

नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेमध्ये झालेल्या रु १४९.८२ कोटी शासकीय रोखे खरेदी घोटाळयाबददल महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियमाच्या कलम ८८ अंतर्गत चौकशीसाठी प्राधिकृत अधिकारी नियुक्ती करण्यात आली होती. कालांतराने दि. १६.६.२०१४ रोजी फेरचौकशीसाठी श्री . खरबडे यांची प्राधिकृत अधिकारी म्हणून नियुक्ती केली होती. तथापि, मा. उच्च न्यायालयाच्या दि. २.३.२०१७ रोजीच्या निर्देशानुसार श्री खरबडे ,चौकशी अधिकारी यांना कार्यमुक्त करण्यात आले. तसेच या प्रकरणी जनहित याचिका क्र २५/२०१४ मध्ये सेवानिवृत्त प्रधान जिल्हा न्यायाधीश श्री मोहोड यांची प्राधिकृत अधिकारी म्हणून नियुक्ती करुन चौकशी ३ महिन्यात पुर्ण करण्याचे निर्देश मा. उच्च न्यायालयाने दिले आहेत.

श्री. मोहोड यांनी सादर केलेल्या मागणीच्या अनुषंगाने त्यांचे स्वत:चे मानधन, कर्मचा-यांचे मानधन व चौकशीच्या कामकाजासंबंधी इतर अनुषंगीक व्यवस्थेकरीता विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर यांनी संदर्भ क्र २ अन्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने त्यांची नियुक्ती व त्यासंदर्भातील इतर खर्चाच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जनहित याचिका क्र २५/२०१४ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या दि. ५.५.२०१७ रोजीच्या निर्देशानुसार नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेची महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ८८ अंतर्गत चौकशीसाठी श्री. एस.डी. मोहोड, सेवानिवृत्त प्रधान जिल्हा न्यायाधीश यांची प्राधिकृत अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

२. श्री. एस.डी. मोहोड, सेवानिवृत्त प्रधान जिल्हा न्यायाधीश यांची प्राधिकृत अधिकारी म्हणून नियुक्ती व त्यासंदर्भातील इतर खर्चाबाबतच्या अटी /शर्ती खालीलप्रमाणे राहतील :-

i) प्राधिकृत अधिकारी श्री एस.डी.मोहोड यांना जिल्हा प्रधान न्यायाधीश यांना अनुज्ञेय असलेले वेतन व भत्ते इतके मानधन दरमहा अदा करण्यात यावे. सदर चौकशीचे कामकाज त्यांनी तीन महिन्यात पूर्ण करुन आपला अहवाल द्यावा.

ii) बँकेकडे न्यायालयीन कामकाजाचा अनुभव असलेले कर्मचारी नसल्यामुळे प्राधिकृत अधिकारी यांच्या नियंत्रणाखाली त्यांनी नियुक्त केलेल्या प्रबंधक-१, स्वीय सहाय्यक १, व वाहनचालक १ यांची तात्पुरत्या नियुक्तीसाठी व चौकशीचे कामकाज पुर्ण होईपावतो त्यांना पुढीलप्रमाणे द्यावयाच्या मानधनास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | मानधन | प्रवासभत्ता | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | प्रबंधक | रु २५,०००/- | रु ५,००० | रुपये ३०,००० |
| २ | स्वीय सहाय्यक | रु. ३५,०००/- | रु ५,००० | रुपये ४०,००० |
| ३ | वाहनचालक | रु १०,०००/- | रु २,००० | रुपये १२,००० |

iii) प्राधिकृत अधिकारी यांना व त्यांच्या कार्यालयासाठी वरीलप्रमाणे तात्पुरत्या स्वरुपात निर्माण करावयाच्या पदांचे वेतन व भत्ते यासाठी येणारा खर्च आणि प्राधिकृत अधिकारी यांच्या कार्यालयीन कामकाजासाठी लागणारा खर्च नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या, नागपूर यांच्या निधीतून भागविण्यात यावा.

iv) प्राधिकृत अधिकारी यांनी स्वत:चे वाहन वापरण्यास सहमती दर्शविली असल्याने सदर वाहनासाठी त्यांनी मागणी केल्याप्रमाणे दरमहा ७५ लिटर पेट्रोल उपलब्ध करुन द्यावे. सदर खर्च बँकेच्या निधीतून भागविता यावा.

v) प्राधिकृत अधिकारी यांच्या मागणी प्रमाणे आवश्यक लेखन सामग्री, इंटरनेट सुविधेसह संगणक, प्रिंटर्स, स्कॅनर, दुरध्वनी व अनुषंगिक व्यवस्था बँकेच्या निधीतून उपलब्ध करुन द्याव्यात.

vi) प्राधिकृत अधिकारी यांना कामकाजामध्ये सहकार्य व समन्वय करण्यासाठी शासनातर्फे जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर व संबंधित बँकेतर्फे श्री. राजेश वैद्य यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

vii) नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या., नागपूर यांनी चौकशीच्या कामकाजासाठी लागणारा निधी वेळोवेळी उपलब्ध करुन द्यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१३१६१२०४८४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2017.07.13 16:09:24 +05'30'

(दि.म. राणे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) श्री. एस.डी. मोहोड,सेवानिवृत्त प्रधान जिल्हा न्यायाधीश (विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर मार्फत)

२) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, नागपूर खंडपिठ, नागपूर
३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर
५) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर
६) मुख्य कार्यकारी अधिकारी/ प्रशासक, नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, नागपूर.
७) अवर सचिव (कार्यासन १७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८)निवड नस्ती (कार्यासन २-स).